**पशुसंवर्धन विभागाच्या अनिवार्य खर्चाच्या राज्यस्तर व स्थानिकस्तरावरील लेखाशीर्षांचे एकत्रिकरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१३३/पदुम-१६/(E-६९९७९२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १२ मार्च, २०२४

**वाचा :-** १) आयुक्त पशुसंवर्धन यांचे क्र.बीजीटी-१/प्र.क्र.१७/उपलेखाशीर्ष एकत्रिकरण/१७०२/२२, औध पुणे ६७, दि.२०/७/२०२२
२) मा.महालेखापाल यांचे क्र. क्र. सं.ख.वि./ चा-१ कृ.पशु.डे.व.म.वि./युओआर-३३/२०२३-२४/३५६, दिनांक १९/०६/२०२३ व क्र. सं.ख.वि./ चा-१ कृ.पशु.डे.व.म.वि./युओआर-१५०/२०२३-२४/१०६३, दिनांक १६/०१/२०२४

**प्रस्तावना :-**

आयुक्त पशुसंवर्धन यांच्या अधिनस्त पशुसंवर्धन विभागाच्या २४०३- पशुसंवर्धन ( अनिवार्य) अंतर्गत महसूली खर्चाच्या एकूण ४७ लेखाशीर्षे ( राज्यस्तर - ३० + २ भारीत खर्च, स्थानिकस्तर- १५ ) आहेत. पशुसंवर्धन विभागामार्फत दिल्या जाणाऱ्या सोयीसुविधांची व्याप्ती वाढविणे तसेच त्यांच्या गुणवत्ता वाढवून त्या अधिक लोकाभिमुख करणे, पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जा वाढ करणे इत्यादीच्या अनुषंगाने विभागांतर्गतच्या संस्था/ कार्यालये/ नवनिर्मित जिल्हे/ तसेच विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांतर्गत कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांची पदे वेळोवेळी मंजूर करण्यात आली आहेत, त्यात वाढ करण्यात आली आहे,तसेच आवश्यकतेनुसार पदांची पुनर्रचना करुन समायोजित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार पशुसंवर्धन आयुक्त कार्यालय, प्रादेशिक कार्यालये, जिल्हा कार्यालये, रुग्णालये व दवाखाने, चिकित्सालये तसेच अन्य स्वतंत्र संस्था अशा विविध कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांचे वेतन व अनिवार्य खर्चाच्या वेतनेतर बाबीवरील खर्च भागविण्यात येतो.

आयुक्त पशुसंवर्धन यांनी संदर्भ क्र.१ अन्वये कळविल्यानुसार विभागांतर्गत वरीलप्रमाणे वेळोवेळी निर्माण करण्यात आलेल्या स्वतंत्र लेखाशीर्षानुसार स्वतंत्र अर्थसंकल्पिय अंदाजपत्रके तयार करणे, निधी कमी पडल्यास आवश्यतेनुसार लेखाशीर्षनिहाय पूरक मागणी/ पुनर्विनियोजन प्रस्ताव सादर करणे, त्यामुळे विविध प्रकारच्या प्रदानांमध्ये विलंब होणे, तसेच जिल्हा परिषद स्तरावरील कार्यरत पदांसाठी जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद हेच आहरण व संवितरण अधिकारी असले तरीही योजनेतर योजनेअंतर्गत हस्तांतरीत झालेल्या योजनेवरील पदांकरीता प्रत्येक प्रकरणी नव्याने उपलेखाशीर्ष मंजूर झाल्याने कामकाजात अनावश्यक वाढ होत आहे. त्यामुळे उपरोक्त लेखाशीर्षाकरीता वेतन, वेतनेतर बाबीकरीता वित्तीय कामकाज करताना अनावश्यक विलंब होऊन निधी विहित कालमर्यादेत खर्च होण्यात अडचणी येत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आणून दिली आहे. सदर बाब विचारात घेऊन मागणी क्रमांक डी-४,मुख्यलेखाशीर्ष २४०३- पशुसंवर्धन या अंतर्गतच्या अनिवार्य खर्चाच्या विविध लेखाशीर्षांचे एकत्रिकरण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

पशुसंवर्धन विभागाच्या मागणी क्रमांक डी-४, मुख्यलेखाशीर्ष २४०३- पशुसंवर्धन अंतर्गत अनिवार्य खर्चाच्या राज्यस्तरावरील एकूण ३२ राज्यस्तर (३० + २ भारीत) लेखाशीर्षांपैकी १६ लेखाशीर्षांचे एकत्रिकरण करुन ५ लेखाशीर्ष करणे. तसेच स्थानिक स्तरावरील एकूण १५ लेखाशीर्षांपैकी १२ लेखाशिर्षांचे एकत्रीकरण करुन २

लेखाशीर्षे करणे, अशाप्रकारे पशुसंवर्धन विभागाच्या एकूण ४७ लेखाशीर्षांपैकी (अनिवार्य) खालीलप्रमाणे राज्यस्तर व स्थानिकस्तरावरील एकूण २८ लेखाशीर्षांचे गौणशिर्षनिहाय एकत्रिकरण करुन ७ लेखाशीर्षे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | पूवीचे लेखाशीर्ष | | अ.क्र. | एकत्रिकरणानंतर नविन लेखाशीर्ष | |
|---|---|---|---|---|---|
| | **००१ - संचालन व प्रशासन** | | | | |
| १) | (०१)(०१) पशुसवर्धन संचालनालय | २४०३००१५ (भारित) | १ | (०१) योजनेतर योजना<br>(०१)(०१) पशुसंवर्धन विभाग | २४०३००१५ ( भारित ) |
| २) | (०१)(०२) विभागीय कार्यालये | २४०३००९८ (भारित) | | | |
| | **१०१- पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य** | | | | |
| ३) | (०१)(०१) रुग्णालये व दवाखाने | २४०३०१४२ | २ | (०२) पशुवैद्यकीय सर्व चिकीत्सालये<br>(०२)(०१) पशुवैद्यकीय सर्व चिकीत्सालये | २४०३०१५१ |
| ४) | (०२)(०१) पशुवैद्यकीय सर्व चिकीत्सालये | २४०३०१५१ | | | |
| ५) | (०७)(०१) आंतरराज्य सीमेवरील चौक्या व दक्षता पथके | २४०३०२०२ | | | |
| ६) | (०८)(०२) राज्य योजनांतर्गत योजना पशुवैद्यकिय बहुचिकीत्सालयाचा विस्तार व आधुनिकीकरण करणे (जिल्हा) | २४०३०२११ | | | |
| ७) | (०८)(०१)- राज्य योजांतर्गत योजना रुग्णालये व दवाखाने, (उद्दिष्ट-०१-वेतन व ११-देशांतर्गत प्रवास) | २४०३०२२२ | | | |
| ८) | (०८)(१७)-पशुवैद्यकिय दवाखान्यांचा अनुशेष दूर करणे (१०० टक्के राज्य योजना) | २४०३२३१२ | | | |
| ९) | (०८) (३६)पशुवैद्यकिय मदत केंद्रांचा व आधारभूत ग्राम उपकेंद्रांचा दर्जा वाढविणे (१०० टक्के राज्य योजना) | २४०३२४४८ | | | |
| | **१०२- पशु व महिष विकास** | | | | |
| १०) | (०३)(०१) आधारभूत ग्राम योजना | २४०३०३३८ | ३ | (०४) कृत्रिम रेतन केंद्रे<br>(०४)(०१) कृत्रिम रेतन केंद्रे | २४०३०३४७ |
| ११) | (०४)(०१) कृत्रिम रेतन केंद्रे | २४०३०३४७ | | | |
| १२) | (०८)(०१) कृत्रिम रेतन केंद्रे | २४०३०४३६ | | | |
| | **१०३ कुक्कुट विकास** | | | | |
| १३) | (०१)(०१)-कुक्कुट पैदास क्षेत्रे व अंडी उबवणी केंदे | २४०३०४७२ | ४ | (०१) कुक्कुट पैदास क्षेत्रे व अंडी उबवणी केंदे | २४०३०४७२ |
| १४) | (०२)(०१)-प्रकर्षित कुक्कुट विकास | २४०३०४८१ | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | गट | | | (०१)(०१)-कुक्कुट पैदास क्षेत्रे व अंडी उबवणी केंदे | |
| | **१०९- विस्तार व प्रशिक्षण** | | | | |
| १५) | (००)(०१)-सेवांतर्गत प्रशिक्षण | २४०३०७०३ | ५ | (००)<br>(००)(०१)-सेवांतर्गत प्रशिक्षण | २४०३०७०३ |
| १६) | १०९ (००)(०३)-कुक्कुट पालन प्रशिक्षण | २४०३०७२१ | | | |
| | **स्थानिक स्तर** | | | | |
| | **१०१- पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य** | | | | |
| १७) | (०६)(०१)-रुग्णालये व दवाखाने | २४०३०१९६ | ६ | (०६) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (०६)(०१)-रुग्णालये व दवाखाने, | २४०३०१९६ |
| १८) | (०६)(०२)-पशुवैद्यकिय सेवा | २४०३२६३५ | | | |
| १९) | (०६)(०३)- भूतपूर्व जिल्हा स्थानिक मंडळाचे पशुवैद्यकिय दवाखाने. | २४०३२६४४ | | | |
| २०) | (०६)(०४)-फिरते पशुरोग मध्यवर्ती नियंत्रण पथक | २४०३२६५३ | | | |
| २१) | (०६)(०५)-फिरते पशुरोग नियंत्रण पथक/फिरती पशुवैद्यकिय चिकीत्सालय | २४०३२६६२ | | | |
| २२) | (०८)(०१)-राज्य योजांतर्गत योजना रुग्णालये व दवाखाने, (उद्दिष्ट-३१-सहा.अनु.( वेतनेर) व ३६ सहा.अनु. ( वेतन )) | २४०३०२२२ | | | |
| २३) | (०८) (१८) पशुवैद्यकिय दवाखान्यांचा अनुशेष दूर करण्यासाठी जिल्हा परिषदांना योजनातंर्गत अनुदाने (राज्य योजना) (जिल्हा) | २४०३२३२१ | | | |
| | **१०२- पशु व महिष विकास** | | | | |
| २४) | (०५)(०१) स्थानिक क्षेत्र आस्थापना | २४०३०३७४ | ७ | (०५) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने<br>(०५) (०१) स्थानिक क्षेत्र आस्थापना | २४०३०३७४ |
| २५) | (०५)(०२)- जिल्हा वळू योजना, | २४०३२६८२ | | | |
| २६) | ( ०५)(०३)-आधारभूत ग्राम योजना | २४०३२६९१ | | | |
| २७) | (०५)(०४)- देवणी पशु आणि दूधाचा अभिलेख ठेवणे. | २४०३२७०६ | | | |
| २८) | (०५)(०६)-गोशाळा व पांजरपोळ विकास योजना. | २४०३२७२४ | | | |

तसेच पशुसंवर्धन विभागांतर्गतची राज्यस्तरावरील १६ एकल व स्थानिक स्तरावरील ३ एकल लेखाशीर्ष स्वतंत्र ठेवण्यात येत आहे. त्यानुसार पशुसंवर्धन विभागाच्या २४०३- पशुसंवर्धन अंतर्गत अनिवार्य खर्चाच्या लेखाशीर्षांच्या एकत्रिकरणानंतर, पशुसंवर्धन विभागाची राज्यस्तरावरील एकल १६ लेखाशीर्षे व स्थानिकस्तरावरील एकल ३ लेखाशीर्षे मिळून आता मागणी क्रमांक डी-४, मुख्यलेखाशीर्ष २४०३- पशुसंवर्धन, अंतर्गत अनिवार्य खर्चाची एकूण २६ ( ७+१६+३=२६) लेखाशीर्ष राहतील.

२. आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयांच्या वरीलप्रमाणे एकत्रिकरण करण्यात आलेल्या लेखाशीर्षांकरीता आवश्यकतेनुसार आहरण व संवितरण अधिकारी निश्चित करावे व त्यानुसार संचालक, लेखा व कोषागारे यांच्या संपर्क साधन सदर आहरण व संवितरण अधिकारी यांचे नविन लेखाशीर्षनिहाय मॅपिंग करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

३. आयुक्त पशुसंवर्धन अंतर्गतच्या अनिवार्य खर्चाच्या काही लेखाशीर्षांच्या नावापुढे ( Nomenclature ) योजना असे नमूद करण्यात आलेले असून हिस्सा (%) या चिन्हाने दर्शविण्यात आलेला आहे. यासंदर्भात वित्त विभागाने सूचित केल्यानुसार पशुसंवर्धन विभागाच्या अनिवार्य खर्चाच्या लेखाशीर्षांच्या नावात (Nomenclature ) आवश्यकतेनुसार सुधारणा करण्याच्या अनुषंगाने प्रस्ताव मा. महालेखापाल यांच्या मान्यतेसाठी शासनास सादर करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय मा. महालेखापाल, मुंबई यांच्या संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ७०१/२०२२/व्यय-२, दिनांक ०३/०१/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१२१६४७४२३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.03.12 16:57:22 +05'30'

**( नि. भा. मराळे )**
**उप सचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री ( पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर.
३. सचिव (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) ,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे- ६७.
५. संचालक, लेखा व कोषागारे,महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. वित्त विभाग ( व्यय-२/अर्थ-१५) मंत्रालय, मुंबई
७. उप सचिव (पशुसंवर्धन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय विभाग, मुंबई
८. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन

९. सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त
१०. सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद
११. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवसी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१४. अवर सचिव / कक्ष अधिकारी ( पदुम-१/२/३/४ ) कृषि व पदुम, मंत्रालय विभाग, मुंबई
१५. निवड नस्ती.